राज्यातील ऊस पीक कर्जाच्या
परतफेडीस मुदतवाढ देण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सीसीआर-१४१३/प्र.क्र.४०४/२-स,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ०३२.
तारीख: ०१ जुलै, २०१५

वाचा -

१. **शासन निर्णय क्रमांकः सीसीआर-१४९९/प्र.क्र.१३५/२-स, दिनांक २६/४/१९९९.**
२. **सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांचे पत्र क्र. अर्थ/अजा/डॉ.पंदेव्यासयो/२०१५, दि. २२ जून, २०१५**

**प्रस्तावना -**

राज्यातील जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका व व्यापारी बँकांमार्फत शेतकऱ्यांना पीक कर्ज पुरवठा करण्यात येतो. राज्यातील जे शेतकरी बँकेकडून घेतलेल्या कर्जाची परतफेड दि. ३० जूनपर्यंत करतात अशा शेतकऱ्यांना पीक कर्जाची विहित मुदतीत परतफेड करण्यासाठी व्याजामध्ये प्रोत्साहनपर सवलत देण्यासाठी शासनामार्फत डॉ. पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजना राबविण्यात येत आहे. या योजनेमुळे राज्यातील बहुतांश शेतकरी त्यांच्या पीक कर्जाची परतफेड विहित मुदतीत करीत आहेत. त्यामुळे बँकांची पीक कर्जाची वसुली होण्यास मदत होत आहे.

राज्यातील ऊस गाळप हंगाम २०१४-१५ मध्ये १७८ साखर कारखान्यांनी ९२९.५४ लाख मे.टन ऊसाचे गाळप करुन १०४.८२ लाख मे.टन साखरेचे विक्रमी उत्पादन केले आहे. आंतरराष्ट्रीय व देशांतर्गत बाजारपेठेत घसरलेल्या साखरेच्या किंमतीमुळे या वर्षी साखर कारखान्यांनी शेतकऱ्यांना एफ.आर.पी. प्रमाणे ऊसाची रक्कम अदा केलेली नाही. राज्यातील १७८ साखर कारखान्यांची दि. ३१/५/२०१५ अखेर एफ.आर.पी. प्रमाणे देय रक्कम रु. १८,९६९.४१ कोटी इतकी होती. यापैकी साखर कारखान्यांनी रु. १५,०९१.१० कोटी इतकी रक्कम ऊस उत्पादक शेतकऱ्यांना अदा केली असून रु. ३८७८.१० कोटी इतकी रक्कम शेतकऱ्यांना अदा करणे बाकी आहे. अनेक कारखान्यांनी शेवटच्या टप्प्यात गाळप केलेल्या ऊसाची कोणतीही रक्कम शेतकऱ्यांना अदा केली नसल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे.

एफ.आर.पी. च्या थकित रकमेमुळे ज्या शेतकऱ्यांनी ऊस पीक कर्ज घेतले आहे अशा शेतकऱ्यांना दि.३० जून, २०१५ अखेर पीक कर्जाची परतफेड करणे शक्य होणार नाही. त्यामुळे हे शेतकरी डॉ. पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजनेच्या लाभापासून वंचित राहण्याची शक्यता आहे. यास्तव राज्यातील ऊस उत्पादक शेतकऱ्यांना डॉ. पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजनेचा लाभ मिळण्यासाठी सदर पीक कर्ज परतफेडीचा कालावधी दि. ३० जून, २०१५ ऐवजी दि. १५/८/२०१५ पर्यंत वाढविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

उपरोक्त प्रस्तावनेत नमूद केलेली राज्यातील साखर उद्योगाची विशिष्ट परिस्थिती विचारात घेता राज्यातील शेतकऱ्यांना पीक कर्जाच्या परतफडीसाठी चालू आर्थिक वर्षापुरती (सन २०१५-१६) दि. ३० जून, २०१५ ऐवजी दि. १५ ऑगस्ट, २०१५ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे. या मुदतीत पीक कर्जाची परतफेड करणारे ऊस उत्पादक शेतकरी डॉ. पंजाबराव देशमुख व्याज सवलत योजनेचा लाभ मिळण्यास पात्र ठरतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७०११७४३३०९००२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Arun Patil

Digitally signed by Santosh Arun Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Officer On Special Duty, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=e52439642ab57c332b2a3e3e46f0d907ba6167409ef6d52c943bf775ecf042fd, cn=Santosh Arun Patil
Date: 2015.07.01 17:44:55 +05'30'

**(संतोष पाटील)**
विशेष कार्य अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत -:**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
२) मा. मंत्री (सहकार, पणन व वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव.
३) मा. राज्यमंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव.
४) मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव. (सर्व)
५) मा. विधान परिषद सदस्य / विधानसभा सदस्य. (सर्व)
६) मा. अप्पर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई.
७) मा. अप्पर मुख्य सचिव (नियोजन), मंत्रालय, मुंबई.
८) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९) सह सचिव, कृषी मंत्रालय, भारत सरकार, कृषी भवन, नवी दिल्ली.
१०) मुख्य अधिकारी, रिझर्व्ह बँक ऑफ इंडिया, ॲग्रीकल्चर क्रेडिट डिपार्टमेन्ट, मुंबई.
११) विभागीय आयुक्त (सर्व).
१२) जिल्हाधिकारी (सर्व).
१३) जिल्हा उप निबंधक, सहकारी संस्था (सर्व).
१४) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व).
१५) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक मर्या., मुंबई.
१६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक (सर्व).
१७) समन्वयक, राज्य स्तरीय बँकर्स समिती, बँक ऑफ महाराष्ट्र, पुणे.
१८) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरीक्षण), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१९) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरीक्षण), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२०) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
२१) सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई.
२२) कक्ष अधिकारी (१६-स / १७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
२३) निवडनस्ती (२-स).